

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एक १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com


## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**


अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ५. आगस्ट १८८२. अंक ८.

हें मासिक पुस्तक
पुणें येथें
ज्ञानप्रकाश छापखान्यांत
छापिलें.

किंमत ८ आणे.

अनुक्रमणिका

**चुकीची दुरुस्ती**–थो० शाहू महाराज यांचें चरित्र पृ० ५० टी० ४६ मध्यें 'इंग्रजी इतिहासांत कोठें नाहीं' असें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. **ग्रांट् डफ्** व **डइल्क्स** यांच्या ग्रंथांत ह्या स्वारीचा उल्लेख आहे.

---

# सूचना.

आम्ही श्री **रामदास**कृत रामायणापैकीं सुंदरकांड व युद्धकांड हीं छापण्यास लौकरच प्रारंभ करणार आहों. तर यांच्या आणखी प्रती कोणापाशीं असल्यास त्या आमच्याकडे पाठविण्याची कृपा करावी. म्हणजे शुद्ध करण्याच्या कामास मदत होईल. काम झालें म्हणजे ज्यांच्या त्यांस परत केल्या जातील.

**का० सं० व्यवस्थापक.**

---

## विषयक्रम.

**बखरी.**



**मराठी कविता.**



**संस्कृत कविता.**

त्रिंबकराव दाभाडे लढाईंत पडले त्या वर्षीं[५२] श्रावणमासीं ब्राह्मण तळेगांवीं जमा जाले. पंचमी पर्यंत त्यांस सिधा व लिंगार्चन सांगणें [ तें न सांगतां, ] दक्षणा दाभाडे यांणीं बंद केली. ब्राह्मण षष्ठींचे दिवशीं सर्व पुण्यास येऊन बाजीराव यांस "तुम्ही सेनापति मारले, आमचें ब्राह्मणांचें अन्न [ त्याचा ] उच्छेद जाला, हें अपेश तुम्हांवर आलें" बोलले. त्यावरून तात्काळ महाराजांस विनंती लिहिली जे, "ब्राह्मणांचा धर्म सेनापतींनीं रहित केला. सरकारचा धर्म कोणीही चालवावा. सरकारची नेमणूक आमचे तालुक्यांत मजुरा येईल." म्हणोन ब्राह्मणांस भोजन स्वयंपाक करवून करविलें. पर्वती नजीक * जागा करून षष्ठीस प्रारंभ करून पंचवीस हजार ब्राह्मणभोजन दोन दिवस व दक्षणा यथायोग्य [ देऊन ] महाराजांची आज्ञा सांडणींची डांक पाठवून येतील ब्राह्मण त्यांस भोजन व षष्ठीस दक्षणेस आरंभ करून सप्तमीस समाप्त करावेंसें केलें. आणि तो क्रम चालविलें[५३].

उमाबाई दाभाडे पुत्र वारिले म्हणोन बहुत यागी[५४] जहाली. यावरून महाराजांनीं चित्तीं आणिलें जें, "उभयतां सरदार आपले. कलह होऊन अयुक्त गोष्ट जहाली. यांचें समाधान करावें." म्हणोन श्रीम्हादेव येथें श्रींचे दर्शनास स्वारी जाऊन श्रीजेजूरीस गेले. तेथून तळेगांवीं जाऊन उमाबाईचें समाधान बहुत रीतीनें करावें तसें करून त्रिंबकराव यांस पुत्र येशवंतराव दाभाडे होते त्यांस व उमाबाईस समागमें घेऊन सातारियास बराबर आणिलें. आणि बाजीराव प्रधान यांसही बोलावणें पाठवून आणविलें. उभयतांचीं बोलणीं ऐकून घेऊन उभयतांनीं पुढें कसें चालणें त्याचे तह करून देऊन, या उपरि कोणीं किंतु न धरितां सरकार सेवा करावी, एक विचारें असावें, उभयतांनीं कोणते मुलकांत कोणता अंमल कसा वहिवाटावा [ तें कळवून ] माळवा व गुजराथीची हद्द करून देऊन निमे स्वराज्याचा ऐवज हुजूर सरकारांत § यावा, निमेंत फौजेचा खर्च करून हिशेब समजवावा, त्यांत जातीचे खर्चाची नेमणूक करून पेषकशी[५५] होईल ते हुजूर यावी, ऐसे तह उभयतांसही करून दिल्हे. येशवंतराव सेनापति यांस पदाचीं वस्त्रें बहुमान यथा पद्धति देऊन गौरव करून निरोप दिल्हा. येशवंतराव व्यसनी जाले. वेहोषें[५६] राहूं लागले. या

---

* प्रथम दक्षणेचा समारंभ नदीच्या काठीं खबुतरखान्यांत होत असे, असें अन्यत्र लिहिलेलें आढळतें.

५२. ह्या वरील लढाईचा व दक्षणेच्या आरंभाचा शक (१६५२) बरोबर आहे, परंतु ही गोष्ट बुंदेलखंडाचा तंटा मोडून येण्याचे (१७३३ इ॰ स॰) पूर्वी झाली. बखरींत लिहिल्याप्रमाणें मागाहून घडली नाहीं.

५३. मागें पृ॰ २६ टी॰ ३२ पहा.

५४. यागी=संतप्त, दुःखी.

§ तो पेशव्यांचे मार्फत यावा. ग्रां॰ ड॰.

५५. पेषकशी=नजराणा.

५६. बेहोष=बंद, अमलांत मग्न.

अनुक्रमणिका

मुळें पिलाजी गायकवाड यांणीं गुजराथ प्रांतींची स्वारी व काठेवाड वगैरे अमल करीत जावे, उमाबाई खबरदार आहेत त्यांचे विचारें त्यांचे आज्ञेंत वागून कारभार चालवावा ऐसें करून दिल्हें.§

आनंदराव महादेव खासनीस पोतनीस यांजपासोन कांहीं अमर्यादा अपराध जाला. याजवरून त्यास शीक्षा करावी, ऐसें महाराजांचे अंतःकरणीं आलें. हें त्यांस कळलें. यावरून ते व त्यांचे बंधु बाजीराव महादेव उभयतां निघोन फिरंगणांत गेले. दरखावर कारकून होते व दुसरे नेमून काम चालविलें. त्यांचे सापत्न बंधु धाकटे येशवंतराव महादेव भोरपेस होते. त्यांस घेऊन त्यांची मातुश्री आली. यावरून ते व हे एकत्र नाहींत ऐशी खातरजमा करून घेऊन, कांहीं दिवस दरमहा हलका करून देऊन, तशीच सेवा घेतली. त्यांणीं पाय उतारा स्वारींत राहून बहुत निष्ठेनें श्रम साहस फार केले. शहाणे कर्ते पाहून स्वारीचें ५७पोतें व घोडा बसावयास देऊन, दरमहा वाढवून कृपा केली. इनामगांव वुरवडे वगैरे जप्त केले होते ते यांचे नांवें सनदा करून देऊन मोकळे करून दिल्हे. रायगड सोडवणे, हे महाडचे देशपांड्ये, त्यीं राजकारणांत वागूं लागले. कांहीं दिवशीं पोतनिशी खासनिशी दोन्ही दरख यांचे नांवें करार

§ बाजीराव व दाभाडे यांजमध्यें विरोध वाढण्यास कारण असें झालें कीं, स० इ० १७२७।२८ सालीं निजामउल्मुल्क याणीं मराठ्यांमध्यें फूट करून त्यांच्या वाढत्या ऐश्वर्यास अडथळा आणून आपलें माहात्म्य वाढवावें ह्या हेतूनें जाधवरावाच्या मार्फत संभाजीचें राजकारण हातीं धरिलें. पंतप्रतिनिधी त्यास बहुतेक अनुकूळ होतेच. दाभाड्याशींही त्यांणीं संधान बांधिलें. अशा वेळीं बाजीरावाच्या युक्तीनें व हिम्मतीनें त्याचे सर्व बेत त्याच्याच गळ्यांत आले. नबाबाशीं लढाई देण्याचें पतकरून बाजीरावानें त्याचा मुलुख उजाड करून बऱ्हाणपूर जाळण्याची अफवा उठविली. तिकडे निजामाच्या फौजा गेल्यावर आपण झपाट्यानें गुजराथेंत जाऊन अमदाबादचा सुभा सरबुलंद यास निजामानें तुमच्यावर मला पाठविलें अशी भुमका उडविली. व चौथ व सरदेशमुखी देण्यास कबूल असाल तर तुमचे मुलखास इतर लोकांचा उपद्रव न लागण्याची जिम्मा मजकडे आहे असें सांगितलें. सरबुलंद यानें दिल्लीहून मदत येत नाहीं हें पाहून बाजीरावाचें ह्मणणें कबूल करून सनदा करून दिल्या. पुढें बाजीराव यांणीं परत येऊन निजामास हैराण करून आपणांस पाहिजे तसा तह करून घेतला. गुजराथेंत जाऊन ह्या वेळीं बाजीरावानें अशा प्रकारें कारभार केला तो त्रिंबकराव दाभाडे यास बिलकूल खपला नाहीं. निजामाचे मनांतही मराठ्यांत दुई करण्याचा नाद अजून होताच तेव्हां पुढें त्यानें त्रिंबकराव यास चिथावून मी तुमचा पाठपुरावा दक्षिणेंत करतों म्हणून सांगितलें. अशा कारणानें बाजीराव यांस निजाम व दाभाडे हे एकत्र होण्यापूर्वी दाभाड्यास गुजराथेंत गांठावें लागलें.

५७. पोतें=खजीना.

५८. 'त्याही राजकारणांत' को० प्र०

५९. दरख=काम, अधिकार.

करून देऊन बहुमान वस्त्रे देऊन कारखाने स्वाधीन केले. अठराही कारखाने यांची देखरेख खासगीकडील त्यांचे तर्फेचे कारकून ठेऊन चालविली.

निजाम उन्मुलुख यांणीं मनांत विचार केला जे, " महाराज यांचा दिवसेंदिवस उत्कर्ष जाला. माणसें पदरीं मोठीं कर्तीं प्रतापी जालीं. फौज नामी बाळगतात. औरंगाबाद भागानगरपर्यंत फौज सरदार अमल उगवण्यास हिंडतात त्यांत कटकटी पडतात. औरंगाबादेंत आपण केवळ लगत राहणें ठीक नाहीं. तहानीं चालवें हेंच युक्त आहे. भागानगरीं राहण्याचा विचार करावा." म्हणून श्रीपतराव यांजकडे वकील पाठविले. आणि " भागानगर लगत दहा वीस महाल येथील चौथ सरदेशमुखी वगैरे स्वराज्याचे अमल आहेत त्यांचा आकार पाहून गंगातीर बालाघांट वगैरे तिकडील दरोबस्त अमलाखेरीज जागिरीचे महाल अमल आहेत त्या आकारा बरहुकूम दरोबस्त अमल मोबादला घ्यावा म्हणजे कटकटी पडणार नाहींत. बाकी तह ठरेल तसे दोहींकडील अमल तहांनीं दुतर्फा सुरळीत चालवें." हें बोलणें महाराजांस विदित करून वकिलांच्या भेटी करून बोलणें चालविलें. यावरून महाराजांनीं सर्व मुत्सद्दी प्रधान सुद्धां मेळवून विचार विचारिला. तेव्हां बाजीराव प्रधान आपले मतें बोलले जे, " नबाब याशीं हरप्रकारें कटकट वाढवून त्याजवर स्वारी व लढाई देऊन त्याजपासोन जागिरीचा अमल महाल सुटतील तितके सोडवावयाचे. आणि हा असा तह ते कटकट पडूं नये [ म्हणून ] मोबादला करावे, भागानगरीं जाऊन रहावें [ हें ] मनांत आणून बोलतात. हा तह करण्यांत विशेष दिसत नाहीं. आम्हांस आज्ञा जाली तरि हरप्रकारें त्यांची आगळीक जाली ऐसें करून मोबादला महाल बालाघांट गंगातिरचे दरोबस्त करून देणार ते मोबादला अमल भागानगराकडील न देतां सरकारांत सोडवून देतों." ते-समयीं महाराजांनीं आज्ञा केली जे, " प्रतिनिधि राजकारण बोलतात हें एक वेळ सिद्ध करून महाल मोबादला येतात ते घ्यावे. भागानगर प्रांतीं दूर रहातात हा एक पक्ष चांगलाच आहे. तें जालियाबरि तुम्ही बोलतां ही मसलत पुढें करणेंच आहे. ते करावयासि येईल," बोलले. यावरून, " सरकारची आज्ञा होते त्याअर्थीं आम्हांस राजकारणाचे बोलण्यांत गोवूं नये. आज्ञा जाण्याची द्यावी. [ आणि ] नंतर सरकारची मर्जी तसें करावें," बोलले. यावरून निरोप दिला. ते पुण्यास निघोन गेले. नंतर महाराजांनीं दादोराव भीमसेन भागानगर प्रांतींचे स्वराज्याचे अमल उगवणें या कामावर व वकिलीवर होते, त्यांस आणवून आकार व मोबादला महाल कोणते घ्यावे हें पाहून, मोबा-

दला महाल घेऊन तहनामा ठरविला, आणि प्रतिनिधीचें मनोगत सिद्धीस नेलें. शके १६५० तिसां अशरीन मया व अँलफ.

[ तिकडे ] संभाजी राजे यांजकडे मालवण, रांगणा, पन्हाळा, होते. तों ते बंधुच आहेत, त्यांचाही इतमाम चालला पाहिजे, ह्मणून कांहीं मुलुक त्या लगत व स्थळें राहिलीं. खर्चाची नेमणूक व बेनमी करून दिल्हीच पाहिजे. बंधु अधिकारी आहेत म्हणून वरदळ सोसली. परंतु विचारें करून चालावें म्हणून बहुत प्रकारें सांगितलें. तसे चालतील तरि आणखी मुलुक नेमून द्यावा ऐसें महाराजांचें मनोगत, यावरून बहुत प्रकारें बोध करविला. परंतु त्यांचे अंतःकरणीं ती गोष्ट न येई. आणि मनांत आणिलें "शाहू महाराज यांनीं बंदोबस्त करून प्रांत सोडविले. कर्नाटक व हिंदुस्थान व माळवा सोडविले. स्थळें, किल्ले, मुलुख, फौज दौलत त्यांनकडे नमले. यांत राज्यांत आपणांस निमे भाग यावा येविशीं बोलले असतां राज्यांत वाटणी देणें चाल नाहीं. तुम्हांस लागेल तो खर्च माफक नेमणूक घ्यावी म्हणतात. त्यांचे पदरीं माणसेंही पराक्रमी जहालीं. दैवही विचित्र आहे. त्यास आपण मोठें राजकारण व पराक्रम करून दाखवावा तरि राज्यविभाग देतील." ऐसें चित्तांत आणून मनसबा केला जे, "जाधवराव सेनापति महाराजांशीं विरुद्ध होऊन मोंगलाईंत गेले. आपणांकडे आले, परंतु ते समयीं अंगिकार न केला. त्यांपाशीं राजकारण करून, ते आपलेसे करून घेऊन, मसलत करून राज्याचा विभाग करून घ्यावा." म्हणून राजकारणास विठ्ठल त्रिंबक खासनीस तिकडे राहिले होते, त्यांचे पुतणे नीळकंठ प्रभु महाडकर यांस प्रधानपद दिल्हें होतें, त्यांचे भाऊ केशवराव पाठवून जाधवराव यांचे हातें बोलणें लाविलें तेव्हां नबाब यांस अवश्यक पडलें. औरंगजेब येऊन मुलुक सोडविला तो परतोन गेला. तह जाला. सनदा फर्मान करून आणिले त्याप्रमाणें चालवावें ते हिंदुस्थान प्रांत सोडवीत चालले. मसलत करणें. पादशाही [ मध्येंही ] बखेडा जाला. अनायासें घरफूट होऊन राजकारण आलें तें उभें करून मसलत करावी. ऐसें सिद्ध करून जाधवराव यास ही मसलत करणें अवश्यक यावरून "संभाजी राजे यांणीं जी मराठी फौज व सरदार जमले तितके अनुकूळ करून घेऊन यावें. इकडून आम्ही फौज सामान पोख्त करून निघतों. आणि फौजेस खर्च पाहिजे तो तुमचा राज्याचा

६०. प्रतिनिधि नेहमी बाजीरावाच्या विरुद्ध असत व बाजीरावही त्यांची मसलत मोडून काढण्याचा नेहमी प्रयत्न करीत, या गोष्टीचें हें एक उदाहरण होय. ही गोष्ट अर्थात दाभाड्याशीं लढाई होण्याचे पूर्वीं झाली होती.

६१. ह्या कलमाच्या आरंभापासून तों येथपर्यंत लिहिलेला मजकूर कोल्हापूर प्रतींत नाहीं.

वांटा सिद्ध होईल तोंपर्यंत आम्ही दरमहा चालवितों. आणि तुम्हीं किल्ले, कोट, ठाणीं व सरदार मुत्सद्दी यांचीं राजकरणें व भेद होतील तितकें करून निघून यावें." ऐसें राजकारण सिद्ध करून आले. यावरून संभाजी राजे यांणीं कांहीं फौज जमाव केला. रामचंद्र अमात्य वगैरे घेऊन निघोन गेले. तिकडून नबाब पुढें येऊन भेटी होऊन हे ती फौज एकत्र जाले.

संभाजी राजे विपरीत बुद्धि करून हें राज्य देवब्राम्हणांचें, त्यांत श्रीसांब व श्रीभवानीची कृपा, यवन लोकांचा नाश करून राज्य वडिलांनीं स्थापिलें व आम्हीही तेंच करितों, यांत आपण यवनांचे आश्रयास जाऊन राज्यास अपाय करूं इच्छितों, हें शेवटास कसें जाईल, हा विचार करीत नाहींत. त्यापक्षीं आपणांस ही मसलत करणें प्राप्त जाली. म्हणोन वर्तमान समजलियावरून विचार करून सर्व प्रधान व फौज यांस तयारी करून येण्याविशीं पत्रें पाठवून तयारी करविली. नबाब यांणीं तोफखाना व जंगी* सामान गारदी वगैरे मजबूद करून जाधवराव वगैरे सरदार मनसबदार व संभाजी राजे फौज सुद्धां कूच करून पुढें चालून आले. महाराजांनीं सर्व प्रधान बोलावून विचार केला जे, "संभाजी राजे यांणीं मनांत दुर्बुद्धि धरिली आहे. हें राज्य श्रीचे कृपेचें. थोरले महाराज यांजपासोन आजपर्यंत साध्य करण्यास कोण प्रयास लागले?" म्हणोन त्यांस पत्रें लिहिलीं जे, "हें राज्य श्रीचें. यवन लोकांचे आश्रयास जाऊन त्यांचा आश्रय केला त्यास जय कसा येईल? तुम्हांस राज्यलोभ बहुत होता तरि आम्हांस सांगोन पाठवावयाचें होतें. आम्हांपाशीं सेवक लोक दिगांत प्रताप करावे ऐसे आहेत. यांतील तुमचे बराबर एकास देऊन एकादें राज्य साधून दिल्हें असतें. किंवा पूर्वीं महाराजांनीं साध्य केलें त्यांतून तुम्हीं साध्य करून आम्हांस पराक्रम करून दाखवावा होता. किंवा आम्हीं तें राज्य यवनांनीं घेतलें तें पुन्हा सोडवितों. [तेहां] तुम्हांसही याखेरीज यांतील सोडवून दिल्हें असतें. आम्हीं सोडविलें यांत मागावें, व राज्याचा विभाग करावा द्यावा म्हणावें हे कोठें नीत आहे? पूर्वींही कोठें जालें नाहीं. हे कोण बुद्धि केली? कैलासवासी राजाराम साहेब यांणीं औरंगजेब मोठे बलाढ्य शत्रु दोन लक्ष फौज व दोन लक्ष पायदळासुद्धां येऊन संभाजी राजे यांचे अव्यवस्थेमुळें राज्यहरण केलें, सर्व फौज बुडाली, ऐसे समयांत कोणते प्रकारें चंदीकडे आम्हांस टाकून जाण्याचा समय प्राप्त जाला [तेव्हां] तसें करून चंदीस

६२. को० प्रत अमात्याचें नांव देत नाहीं. हा अमात्य रामचंद्र पंताचा पुत्र असावा.

* जंगी=लढाऊ, युद्ध संबंधी. हल्लीं या शब्दाचा अर्थ अगदीं भिन्न झाला आहे.

जाऊन पावले. तेथें फौज व सुभे जमवून दौलत जमविली. आणि तेथून रात्रंदिवस शत्रूशीं लढाया देऊन फौज त्यांची बुडवून राज्याचा भाग अम्मल नेला. पुन्हा तेथें प्रसंग पडला असतां देशीं येऊन लढाया जातीनें देऊन त्यांचीं मोठीं स्थळें औरंगाबाद [वगैरे] जाऊन लुटलीं. ऐशी ख्यात केली. आम्ही नजरबंदींत होतों. त्यांचे पोटीं ते समयीं आपणच राज्याभिषेक करून राज्य करणें, सिंव्हासन करणें, असतें तरि त्यांचे हातीं काय न होतें ? आमचे ठायीं कसें लक्ष ठेविलें, हें तुम्ही जाणत असोन हा विचार केला. बरें, असो. झाली ती गोष्ट बरीच जहाली. याउपरि तरि यवनाचा आश्रय करावा हें विहित नव्हे ऐसें मनांत आणोन हरप्रकारें निघावें. तुह्मांस दौलत पाहिजे ती आम्ही नवीन सिद्ध करून देऊं अगर यांत खर्चास नेमणूक अधिक करून मागींवी.[६३] राज्याचा वांटा म्हणणें हें पुराणांतरींही जहालें नाहीं. हे बुद्धि धरूं नये." ऐशीं पत्रें व सांगोन पाठविलें कीं, "सेनापति सेवक लोक असोन, लढाई करून, हरामखोरी करून, महाराष्ट्र राज्य व धर्म सोडून यवनास शरण गेले. तेही मोठे कुळींचे रामदेवराव जाधवराव यांचा वंश. परंतु [त्यांणीं] धर्म सोडिला. त्यांची अनुकूलता करून सेवक लोकांस व यवनास शरण जाणें हें फार वाईट," म्हणून बहुता रीतीनें सांगून पाठविलें असतां ते गोष्ट त्यांचे चित्तीं कांहींच आली नाहीं. आणि केले मनसुब्याचे अभिमानास पडून, निजाम उल्मुलुख यांणींही प्रतिनिधीचे विद्यमाने बोलणें ठरून तह जाला असतां लागलेच बिघाड करणें हा विचार न करितां, ते व हे मिळोन चालून पुढें आले.

त्यासमयीं महाराजांनीं सर्व सरदार प्रधान पंत व प्रतिनिधी व सेनापति व सरलष्कर व सेना साहेब सुभा, फत्तेसिंग बावा भोसले व पंवार विश्वासराव वगैरे दरखदार चिटणीस, पोतनीस जमा करून विचार केला जे, "निजाम उल्मुलुख यांणीं तह केला [असतां] व पादशाही तह जाला असतां, आमचें गृहच्छिद्र हातीं घेऊन [त्यांणीं] मसलत आरंभिली. जाधवराव निमकहराम होऊन मसलतींत मिळोन राज्याचा विभाग पुराणांतरींही नाहीं तो करावा [म्हणतात.] पाहिजे ते बेनमी करून घ्यावी[६४] म्हटलें असतां ऐकत नाहीं. अशी संभाजी राजे यांस दुर्बुद्धि निर्माण जहाली. याचा विचार कसा करावा ? जातीनें जाऊन नवाब यांशीं लढाई देण्याची ऐसा

६३. याजपुढें कोल्हापूर प्रतींत मजकूर निराळाच आहे तो "अगर या दौलतींतच विभाग कसा करावा हें तुमचें आमचे विचारें बोलून घेऊं. तुम्ही व आम्ही राज्याचे मालक, घरगुती कामास यवनांचा आश्रय करूं नये. वडिलांनीं केलें त्याप्रमाणें तुम्हीं आम्हीं यवनांचा पराभव एक विचारें करून राज्य साधून वडिलांचा नेम सिद्धीस न्यावा."

६४. याबद्दल "पाहिजे तसें करून घ्यावें म्हटलें असतां." को॰ प्रतींत आहे.

आमचा मनोदय जाला आहे. तुम्हीं सर्वांनीं फौजेची तयारी करून निघावें." ऐशी आज्ञा केली. तेसमयीं अष्टप्रधान व सरदार यांणीं विनंती केली कीं, "आम्हीं सारे सेवक लोक असतां महाराजांनींच असे मसलतीस खांसा निघावें, ऐशी कांहीं मातबर मसलत हे नाहीं. खांसा पादशाहा दिल्लीहून चालून आला असतांही स्वामीस निघणें नलगे. ऐशी उमेद आम्ही सेवक ठेवितों. मग या मसलतीस विचार काय आहे? पादशाहींतील एक सुभेदार नबाब चालून येतात, त्यांत संभाजी राजे जाऊन मिळाले म्हणोन मोठी गोष्ट सिद्ध केली नाहीं. आपणांस निघणें तरि दिल्लीची पादशाही घेणें, आणि दुसरें खंडाचें राज्य घेणें, असें असल्यास निघावें ऐसें मनांत आणिलें तरि असो. या कार्यास एका सेवकास आज्ञा करावी. ज्यास आज्ञा होईल तो एकजण हें कार्य करून येईल." ऐसें बोलले. हे सर्वांची उमेद व पराक्रम ऐकून महाराज बहुत संतोषी जहाले. आणि बाजीराव प्रधान व सेनापति व सरलष्कर, सेना साहेब सुभा व हुजरात फौजेचे सरदार यांस "सर्वांनीं तयारी करून निघावें" [ऐशी] आज्ञा जहाली. मोंगलाई लढाई म्हणोन तोफखाना तयार करवून आंगरे[६५] यांस आज्ञा करवून दारू गोळा त्यांणीं पुरवावा ऐसें केलें. पायदळ बराबर दिल्हें. सर्वांनीं एकमतें चालून बाजीराव प्रधान यांचे मसलतीनें चालावें सांगितलें.

बाजीराव प्रधान व सरदार निघोन मोंगलांचे मोकाबल्यास पुढें गेले. आणि विचार केला जे, "तूर्तच लढाई देऊं नये. माणूस व दारूगोळा खराब करूं नये. भोंवतें हिंडून गोषैमाल[६६] देऊन त्यांचा मुलुख मारून धुंदी करावी. रसद[६७] बंद करावी. घेरून धरून जेर करून जागां जागां घालवून लढाई द्यावी." ऐसा विचार करून भोंवताली मुलूख मारून व जाळून फन्ना केला. रसद, दाणा, गल्ला येणार त्या वाटा रोखून धरून मारूं लागले. मोंगलांचे लष्करांत महागाई पडली. मोठी मजल करणें राहिलें. मोठी मजल केली असतां भोंवत्या सडे फौजेच्या टोळ्या करून चोहोंकडून घालवूं लागले. बुनगे मारावे कहीकबाड[६९] मारावें, ऐसें करूं लागले. तेव्हां कोणी कडून कोणते समयीं येतील, घालवितील हा विचार पडला. याजमुळें दोन कोसांची मजल करूं लागले. नबाब यांणीं राजे व जाधवराव यांस बोलावून विचार केला जे, "मराठी फौज लढाई न देतां,

६५. आंगरे यांस सांगण्याचें कारण असें कीं, त्यांस टोपीवाले यांच्या जाहजांत बिलायती दारूगोळा पुष्कळ सांपडे.

६६. गोषूमाल=कान पिळणें, बाजूनें ह- ह्य करून निघून जाणें?

६७. रसद=द्रव्याचा व धान्याचा पुरवठा.

६८. 'तजाल'? चि॰प्र॰

६९. कहीकबाड=दाणा वैरण पुरविणाऱ्या टोळया व त्यांणीं आणिलेलें सामान.

अनुक्रमणिका

मोड जाला तरि त्याचा हिसाब न धरितां, फिरोन पळोन जाऊन येऊन लढाई देतात, मुलूख मारून रसद बंद केली. घाबरें केलें. राजे तुम्ही व जाधवराव म्हराटी फौज, तुम्हीं त्यांच्यामागें लागावें, लढाई द्यावी, तें तुम्हीं करीत नाहीं. तुम्ही उभयतां त्यांप्रमाणें आपले फौजेच्या टोळ्या करून त्यांचे मुलकांत बैसावें, मुलुख मारावा, लढाई देऊन ठाणीं ध्यावीं, हें करीत नाहीं. तुमचे भरंवशियावर, तुम्हीही मराठे, त्यांजप्रमाणें धुंदी कराल, म्हणून मसलत केली. [त्यांशीं] विघाड केला. त्यास याउपरि तरि याप्रमाणें करून त्यांस घाबरें करावें. लष्करास रसद आणून पावती करावी," बोलले. तेव्हां जाधवराव यांणीं उत्तर केलें जे, "आम्हांपाशीं लोक बहुत करून मोंगल आहेत. या-जमुळें धांवणी होत नाहीं." राजे यांणीं उत्तर केलें जे "आम्हांकडील फौज बाहेर रवाना करावी तरि जमात भारी नाहीं. आणि आम्हांस कांहीं एकांतीं बोलावयाचें आहे." म्हणून सर्व लोक आपले कारभारी सुद्धां लावून देऊन नवाबापाशीं बोलले जे, "आम्हांकडील दरमहाचा ऐवज देणें तो कारभारी यांजपाशीं देऊं नये. आम्हांपाशींच पाठवीत जावा." तें ऐकोन बरें म्हणोन सांगोन तबक आणवून निरोप दिल्हा. आणि नबाबांनीं विचार केला जे, "याउपरि पुढें चालून जाणें ठीक नाहीं. फौज गारद होईल." म्हणोन कूच करून मागें सरले आणि मनांत आणिलें कीं, "प्रधान पदींचे अधिकारी व कारभारी ज्यांनीं इतकी मसलत उभी करून राजकारण केलें त्यांचा विश्वास नाहीं. मसलतीचें बोलणें एकीकडे राहिलें. दरमहाचा ऐवज खासगीस नेऊन लोकांस न देतां खजीना करावयाची इच्छा धरिली. शिपाईगिरी व मसलत [७२]कजाखी करणें हें कांहींएक दौलतीचें चिन्हच नाहीं. राजाराम यांचे बेटे, त्यां सारखे असतील, ऐसें आमचे मनांत. ते हे ऐसे कोता अंदेशाचे आहेत. बरें मोठीं पदरीं माणसें मनसबदार व सरदार मोठे कजाखीचे तेही नाहींत. येते समयीं चार लोक नवीन जमाव करून तेही राज्य कसें करावें, त्यांजपासोन काम कसें ध्यावें, हें कांहींच [७३]नाहीं. यांचे भरंवशियावर इतकी मोठी मसलत आम्हीं करून शाहू राजे यांशीं बिघाड केला, ही गोष्ट आम्ही बहुत वाईट केली" म्हणोन नबाबाची हिंमत निघोन गेली. आणि मसलत तरि केली याचा परिणाम दिसत नाहीं म्हणून बहुत विचारांत पडले. या संधींत जाधवरावास बुद्धि आठवली

---

७०. गारद=नष्ट, नाइनाट.

७१. हे संभाजीचे पेशवे निळकंठ प्रभू महाडकर.

७२. कजाखी=भांडाभांडी, आडून पडून लढाई.

७३. हा संभाजीचे उणेपणाचा मजकूर को० व इं० प्रतींत नाहीं.

[ ८९ ] ॥ श्री राम ॥

राजश्री बाळाजी पंडित प्रधान गोसावी यांसि—

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्ने॥ येशवंतराऊ दाभाडे सेनापति दंडवत विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत असले पाहिजे. विशेष खासगत कोठीचे बैल सर[६४] २०० दोनशें येसाजी गव्हाणा याचे स्वाधीन करून सातारा मिरज प्रांतें पाठविले आहेत. ये विशीं गोसावी यांनीं आपल्याकडील कमावीसदारास पत्रें देऊन सरसाल कोठीस हाशिलाचा उपसर्ग न होतां आमदरफ्त[६५] सुरळीत चाले ते गोष्टी केली पाहिजे. जाणिजे. र॥ छ ८ जिल्हेज. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

श्री.
श्री राजाशाहू स्वामी
छत्रपति येशवंतराव
दाभाडे सेनापति.
*

[ ९० ] ॥ श्री ॥

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री कृष्णराव बळवंतराव स्वामी गोसावी यांसि—

पो॥ माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष—भुजापा शिराळकर वाणी वा॥ मौजे कुरडुपें॥———यांणीं मौजे मा॥रची कमावीस रा॥ जगपतराव निंबाळकर यांजकडून केली होती त्यास वाणी मा॥रानें कांहीं अन्याय केला स॥ त्याजला न्यावयाबद्दल भागानगराहून नबाबाकडून सजावल[६६] आले. त्यास वाणी मा॥र मौजे मजकुराहून पळोन जाऊन क॥ केम येथें राहिला आहे, म्हणोन हुजूर विदित जाहालें. त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरि तुम्ही आपले कडील का॥ दारांस ताकीद करून का॥ मा॥रीं सजावल येतील त्यांचे स्वाधीन वाणी मा॥स करून कबज घेणें. जाणिजे. छ २२ रजब सु॥ समानीन मया व अल्लफ. बहुत काय लिहिणें हें विनंती.

[ ९१ ] ॥ श्री ॥

राजश्री त्रिंबकराव दाभाडे सेनापती गोसावी यांसिः—

छ अखंडित लक्षुमी अळंकृत राजमान्य स्ने॥ गोविंदराव नारायण आशीरवाद छ २४ रा॥खर पावेतों आपले कृपावलोकनें करून क्षेम असें. विशेष. इकडील मजकूर ता॥ वैशाख व॥ ३ पावेतों यथास्थित असों विशेष. राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादर यांणीं सरकारची ताकीद

६४. सर=संख्या, (नग, डाग याप्रमाणें)
६५. आमदरफ्त=जाणें येणें.

* हा शिक्का अष्टकोनी आहे.
६६. सजावल=जासूद.

अनुक्रमणिका

पत्रें गकारां*विशीं व शहरचे दखलीविशीं आणलीं त्याचा मा।र पेशजीं लि॥ आहे. हल्लीं पत्राच्या नकला करून पा॥ आहेत. यासि उत्तर केलें कीं, गकारास बहादर येथील अधिकारी यांणीं प्रथम देऊन शहरांत घेतलें होतें. येविशींचीं पत्रें पूर्वीं सरकारांत गेलीं होतीं तें तुम्ही जाणतच आहां. त्या अन्वयावरून कार्तिक माशीं तुमचा आमचा तह ठरला. तेसमयीं यादींत कलम लिहिलें आहे कीं, शहरांत राहतील तों पावेतों बाहेर उपसर्ग होऊं न द्यावा. बाहेर गेले तर शहरांत न घ्यावें. त्याप्रमाणें घडलें असतां शब्द लावावा ऐसें नाहीं. शहरचे आमलाचे दखल मा।र काठेवाड व बरमगांवचे मामलतीचे इजारी यांचे बाकीचा ऐवज सवा लक्ष राहिला आहे तो घ्यावा आणि येथें कारकून राहील त्याणें सीबंदीचा दरमहाचा ऐवज सहा हजार देत जावा. शहरांत बखेडा हरएकविशीं न करावा. सुदामतप्रमाणें चालावें. येविशींची खातरी करावी. म्हणजे सरकार आज्ञेप्रों दखल देऊं. गुंता नाहीं. परंतु त्यास काठेवाडचा ऐवज देणें नाहीं. आणि दखल घेणें त्याजवरून राजश्री गोविंदराव फौजसुद्धां वाडे-कमाडेस मुक्कामास आले आहेत. दस्तूरचीं गावें सहजांत फौजेचे मुक्कामानें खराब होत आहेत. उपाय काय येविशींची विनंती सरकारांत करून उत्तर लौकर पाठवावें. त्याप्रों वर्तणूक करूं. सरकारांतून निक्षून ताकीद यांचे वकील तेथें आहेत त्यांस करवावी कीं, काठेवाड झालेवाडचा ऐवज याची व शहरीं राहील त्याणें दरमाहा द्यावा, सुरळीत चालावें, याची निशा करून दखल घ्यावा ह्मणजे वकीलांचीं पत्रें परभारें येतील. व येथें सरकारचीं पाठ-वावीं ह्मणजे देऊन जाबसाल करूं. त्यांसही समजलें आहे कीं, ऐवजाची निशा जाल्याखेरीज दखल होणार नाहीं. परंतु पत्रें पाठवून खुलासा पहातात. आज पत्रें आलीं कीं, रा॥ चिंतो रणछोड बोधनी यांजकडे शहरची मामलत सांगितली. शहर व दस्तुरचा दखल द्यावा. कारकून मा।र निल्हे कडील पत्र घेऊन आला त्याशीं बोलणें याच अन्वयें जालें. आज उत्तरें घेऊन लष्करांत जाईल. लष्कर कासींद्रे पालडीजवळ आहे. याउपरि घडे तें लिहून पाठवूं. येथें कोणी मामलेदार असतात. सर्वांशीं वाईट बरें कशास बोलावें लागतें मामलेदार येणार तो ज्येष्ट मास पावेतों यावा. आश्वीन मासीं आल्यास पांच महिने शिबंदीचे चालणार नाहीं, गवगवा पडेल. पुढील सालीं रसद कोणी देणार नाहीं. यास्तव लौकर आल्यानें ठीक आहे. माइल विल्हेस लावून चालविलें. हे आशीरवाद.†

---

* 'गकार' कोण? गायकवाड तर नव्हत!

† हें पत्र लिहिणारा कोण तें माहित नाहीं. पत्रांतील मजकुराचा संबंधही तूर्त कांहींच कळत नाहीं.

[ ९२ ] ॥ श्री ॥

चिरंजीव राजश्री धोंडोबा[६७] यांसि—सदाशिव चिमणाजी आशिर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे. विशेष. धारेचा प्रकार उपस्थित जाला होता. तो तीर्थरूपांनीं सोडून तेथें धारेजवळ रा। गोविंद हरी[६८] यांस ठेवून आपण कोटयाच्या रोखें रांणाजीचे[६९] सरहदेस गेले. तेथून दिल्लीचा मार्ग समीपच. पठाणांनींच येऊन लाहोर घेतलें. वजीर व मनसूर अल्लीखान चाळीस कोसांवर गेले. पठाणांचीच सल्लाबत यांजवरि होती. यास्तव वजिरांनीं पादशहांस बाहेर निघावयाविशीं लिहिलें होतें. पादशहा भगेंद्रांनीं वेथिस्त. यास्तव पातशाहांनीं शाहाजादियाचा मरातीब अलमगीर[७०] पादशाहानीं बहादूरशाहा व अजमशास दिल्हा होता त्याप्रमाणें देऊन शाहाजादा वजीरासमीप पाठविला. लढाई होणें होती. पुढें कसकसें जाहालें असेल वर्तमान येईल तें लेहून पाठवूं. येशवंतराव पवार औरंगाबादेहून कूच करून गेले. त्यांचे मागें मागें राघो गोविंद गेले होते. गांठ पडों न देतां ते झाडून गेले. धारेस गेलेसें वर्तमान आलें आहे. नबाब ब्र्हाणपुरास गेला. पुढें जाईलसें दिसत नाहीं. सुरतेकडेही जात नाहीं. रा। गोविंदराव तीर्थरूपांजवळ बोलत होते कीं, नवाब सुरतेस जातो, दाभाडियांचे आपण साहित्य करावें. तेव्हां निमे गुजराथ द्यावी [म्हणजे] साहित्य करूं म्हणाले. त्यास गोविंदराव आह्मांजवळ बोलिले, लक्ष रुपये रोख चहूं पांच पावेतों परगणे जहाले तरि स्वामींनीं मान्य करून साहित्य करावें. त्यास आम्ही म्हणालों कीं, पांच लक्ष रोख, पांचा लक्षांची जागा द्यावी. म्हणोन त्यास मा।रनिल्हे उमाबाई जवळ बोलले. तीं मुलकाची गोष्ट मान्य न करीत. पैका देऊं म्हणालीं व तीर्थरूपांचें उत्तर तो निमे गुजराथ घेऊं तरीच साहित्य करूं ह्मणोन आलें. जरि नबाब सुरतेकडे जाता तर दाभाडेही बोलते. तें होत नाहीं. याजकरितां तो प्रसंग शिथिल पँडला.

[ ९३ ] ॥ श्री ॥

राजश्री रावजी गोविंद गोसावी यांसि—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्ने॥ मल्हार होळकर दंडवत विनंती उपरि तुम्ही राजश्री खंडो माहादेव व सखाराम जगजीवन सह श्रीपंढर-

---

६७. धोंडोबा हे कोण?
६८. गोविंद हरी हे पटवर्धन.
६९. राणाजी उदेपूरचे.
७०. अलमगीर=औरंगजेब.

७१. हें पत्र अपुरें आहे. तथापि हें सन १७४८.४९ सालीं लिहिलें असावेंसें आंतील मजकुरावरून वाटतें.

पुराकडे छ ५ रोजीं गेल्याचें वर्तमान राजश्री माधवराव येशवंत यांचे लिहिल्याव-रून समजण्यांत आलें. तेथें गेल्यावर श्रीचे दर्शनाचा गुंता उर्कोन सरकार प्रकर्णीं बोलण्याचा प्रसंग पडून घाटावर आणिलेंच असेल. कारभारी यांजकडून प्रतिकूलता कोणतीही नाहीं. येक दोस्ताचे रुकाराची गुंता तेही बोलून चालून पल्यावर आणिलेंच* असेल. सारांश प्रसंगीं कोणेही विशींची न्यूनता न पडतां आरंभिला कार [ ? ] अविलंबें शेवटास जाय तें करणें. दुसरें, इंग्रजांनीं काम काजें उगऊन घेण्याची बहुत निकड लाविली होती, त्यांत पन्हाळेकरांची कुमक करून मसलत वाढवावी हा इरादा दिसण्यांत येतो. याचें बारीकपणें वास्तविक असेल तसें लेहून सविस्तरें कळविणें रा॥ छ १७ रजब सु॥ सल्लास अशर मयातैन व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ९४ ] ॥ श्री ॥

पु॥ राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ[७२] स्वामी गोसावी यांसि—

विनंती उपरि राजश्री हिंदुराव सेनापति[७३] थोर मनुष्य, बोलण्यांत, मर्यादेंत, तिलमात्र अंतर दाखवीत नाहींत. आम्ही त्यांचे बहुमानास त्यांचे विचारें मातबर प्रकार करणें प्राप्त झाल्यास त्यांचे मसलतीखेरीज करणार नाहीं. तेही आमच्या डेरियास आले होते. कोणें रोखें जावें, कसें करावें, इत्यादि त्यांच्या विचारें करीत असों. तेही राहिल्या सारखें होईल तित [ के ] करून दाखवावें याच प्रकारें चित्तापासून बोलतात. फौजेचा प्रकार पाहतां स्वामींनीं नेमणूक केली त्यांपैकीं हजार बाराशें तर आलेच नाहींत. आली फौज तिची गणती घेतल्यास चौथाई तर कमी होईलच. तेव्हां फौजही कमी मातबर भरण्यांत समजत नाहीं. निवडक प्रकार तेव्हांच उघडा दिसतो. सरदार छावणीस राहिले. त्यांसही छावणीचें संकट. त्यापक्षीं जितके फौजेस ठेवावें तितका खर्च भारी. यामुळें भागले थकले, सबर निबर, कोणाचे देण्या घेण्यामुळें बनतें, न बनतें यामुळें येकुण माणूस कमी होतें. तेव्हां भरणा कमी. गाडदी तरि चहूंकडे गुंतले. महमद इसफ तरि जरूरीस सिर्‍यांस[७४] पाठविले. आणखी लोक भरणा स्वामीकडून आल्यास त्यास बोलवून घेऊं. येकांड्या असाम्या, घोडे चांगले माणोस आढळाचे थोडे थोडे ज्यास आढळतें तो घेऊन येतो. तूर्त त्याच्या स्वरूपाप्रमाणें रोजमरा करार करून पुढें सर्वांप्रमाणें नालबंदी वगैरे पावेल ऐसें लेहून ठेऊन चाळीस पन्नास तरि ठेविले. शें दोनशें पर्यंत उपयोगी आढळल्या सारिखे वरचेवरि पाहून ठेऊं. चार पथकें निवडून येखादे कामास हुजराचीं

* येथें बाजूवर शिक्का आहे.

७२. हे त्रिंबकराव मामा.

७३. हे घोरपडे मुरारराव गुतीकर.

७४. सिरा प्रांत कर्नाटकांत आहे.

पाठवीन म्हटल्यास नेमणुके प्रमाणें हजारांचे पांचशें जातांना जातात. या प्रकारें अवस्था दाणा चाऱ्यामुळें जाली आहे. राजश्री गोपाळराव गोविंद आमच्या डेरियास येत असतात. राजश्री आनंदराव रास्ते बोलाविल्यास येत असतात. ह्मणोन लिहिलें तें कळलें. ऐशास विचार आचार कर्तव्याकर्तव्य राजश्री मुरारराव घोरपडे यांचे विचारें करितां बहुत उत्तम आहे. ते सांगतील ते नेकसल्ल्हाच[76] सांगतील. फौजेच्या कमतीचा व भरण्याचा अर्थ लिहिला तर तो खराच. छावणीचा प्रकार यास्तव कमती असेल. येकांडे माणोस घोडें पाहून चाळीस पन्नास ठेविले, आणखी येतील तसे पाहून शें दोनशें ठेऊं म्हणोन [लिहिलें] तर चाळीस पन्नास ठेविले ते ठेविले या उपरि नवे लोक येकांडे येकंदर न ठेवणें. वर गोपाळराव व आनंदराव बोलाविल्यास येत असतात म्हणोन तर विचारआचारास उभयतांस बोलावितात. व तेही येतील. गुंता नाहीं. विचार करण्यास सर्वांच्या विचारें केल्यास गुंता काय? जाणिजे छ १० रबिलोवल बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ। छ ५ रा।खर श्रावण

[९६] ॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचंद्र बावा स्वामी गोसावी यांसि--

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणें. विशेष--राजश्री राजे अर्जुनसिंग धंधेरे यांचे वडील लेक बुंधेलियांस मिळोन यांचे कनिष्ट पुत्राशीं झुंज केलें. दोन तीन महिने लढाई जाहाली. नाइलाज देखोन यांचे कनिष्ट पुत्रांनीं जोहॅर[78] करून आपण लो[थ]?टून मेला. मग बुंधेलियाचे आसरियानें यांचे वडील पुत्रांनीं घेतलें. भेलशाचे स्वारीस अर्जुनसिंग याचे ज्येष्ट पुत्रांनीं भेटीस यावयाचें व नजर कबूल करावयाचें राजकारण लाविलें. त्यास आम्ही उत्तर केलें कीं, "अर्जुनसिंग आमचे पदरचे जागे [?] यांचे तुम्हीं भेटीस येणें व नजर कबूल करणें तें आधीं अर्जुनसिंग यांस भेटणें, ते आम्हांस आणून भेटवितील, उपरांतिक नजर करार करूं" म्हणोन उत्तर केलें. त्यास ते सालीं भेटीस न आले. हल्लीं तुम्हाशीं भेटीचा पैगाम करतील. व नजर नियाज[79] कबूल करतील. अगर कबूल केली असली तरी तुम्हीं कबूल न करणें. अर्जुन-

७५. येथपर्यंत त्रिंबकरावांनीं लिहिलेल्या पत्रांतील गोषवारा झाला.

७६. नेकसल्ला=चांगला उपदेश, सदुपदेश.

७७. बाळाजी बाजीरावाचें हें पत्र.

७८. जोहर करून=जाळून घेऊन (लाक्षा) जोहर=(लाक्षा) गृह.

७९. नजरनियाज=(नवस.) नजराणा.

अनुक्रमणिका

सिंगाचे हातून येऊन भेटतील, जागे खालीं करून यांचे हवालीं करतील, तरि भेट घेणें. अर्जुनसिंग पदरचे यांची स्थापना करूं ऐसें आमचें वचन गुंतलें आहे. याजवरि दृष्टि देऊन यांची स्थापना करणें. याचा लेक ज्येष्ठ फंद फिरिंदाची गोष्ट सांगेल त्याजवरि सर्वथा न जाणें. जाणिजे. छ २२ सवाल बहुत काय लिहिणें हे विनंती.*

[ ९६ ] ॥ श्री ॥

चिरंजीव राजश्री नाना यांसि—बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहीत जाणें. विशेष. मियाँ आछनचे मजकुराविशीं मुजफरखान यास पत्र लेहून तुम्हांकडे पाठविलें आहे. तें पावलें असेल. त्यास मिया आछनचा व हबशाचा नोरा होऊन अली नवाजखान याचा तह जाला. आपण लोक सुद्धां बाहेर निघालों म्हणून रा॥ महादाजी केशव यांचें पत्र छ १४ रबिलावर शनवारीं आलें. त्यास याप्रमाणें मजकुर जाला तेव्हां महादाजी केशव व कृष्णाजी अनंत मागें फिरलेच असतील. कृष्णाजी अनंत येऊन कोळ्यांचें[83] पारपत्य करावयाचें तरतुदीस लागतील. मुजफरखान यास पत्र पाठविलें आहे, तें त्यास द्यावें ऐसें नाहीं. याजकरितां पत्र न देणें. व जासुदाबरोबर पत्रें महादाजी केशव व अलीनवाजखान यास वगैरे पाठविलीं आहेत. तीं पत्रें पाठवावयाचें प्रयोजन नाहीं. जासूद तुम्हांजवळ जाऊन पावलेच असतील. त्यास माघारें फिरवावयास जासूद पाठविले असत, तरि तीं पत्रें पावलीं असतील तर [ परत ] पाठवणें. जाणिजे छ १३ रबिलोवर, बहुत काय लिहिणें—मुजफरखानांनीं जाऊन जवार घेतली. गंभीर गड घेतला. याची सलाबत त्यांजवर पडली. कोळी मैदानचे झुंझणार नव्हत. दोन हजार मुजफरखान, सटवोजी जाधव, कृष्णाजीपंत तुम्हीं जलदीनें जावें. उशीर न करावा सत्वर काम उरकेल. उत्तम प्रकारें पारपत्य करावें. घरांतील चोर मळमळित जाहालिया परतेल. लबाडी करतील. हे आशिरवाद. पो॥ छ १६ रबिलावर.

[ ९७ ] ॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचंद्र बावा स्वामी गोसांवी यांसि:—

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल

---

८०. यावरून प्रामाणिकपणा आमच्या राजकार्यधुरंधरांत होता ! ज्याची बाजू ते स्वीकारीत त्यांस कांहीं ते अंतर देत नसत.

*मागें पृ० ७६ टी० ६२ पहा.

८१. नाना पुरंदरे असावे.

८२. सुरतकर?

८३. कोळी जव्हारचे वगैरे.

जाणोन स्वकीय कुशल लिहिणें. विशेष. किल्ले कऱ्हारा हा दतीयेकरानीं पैगाम करून घेतला; आणि झांशी प्रांतीं उपसर्ग करीत आहेत; सरकारची बाकी गेणें ते देत नाहींत; मवाशी मनमाने तैसी करितात, ह्मणोन राजश्री नारो शंकर याणीं लिहिलें त्यास येविशीं त्यांणीं तुम्हांसही लिहिणें तें लिहिलेंच असेल. तुम्हीही या गोष्टीची पैरवी चित्तांत उचित कर्तव्य तें आणलीच असाल. त्यास यंदा दतीयेकरांनीं दो चौं प्रकारें लबाडीच केली. विना त्यास बोडसेकरासारखाच नतिजा दिल्या खेरीज हल्खुर्द राहोन सरकारचा अंमल सुरळीत देतात ऐसें नाहीं. ऐशियास मा॥र निल्लेची मदत फौज पाठवून केली पाहिजे, कीं दहशतीनेंच कऱ्हाऱ्हा सोडीत आणि आपले जागां जाऊन सरकारी अंमल सुरळीत चालतात. याजकरितां येथूनही मीरखान वगैरे मा॥रनिल्लेचे ताबिजातील पथकें आहेत. त्यास ताकीदपत्रें लिहिलीं आहेत व त्या प्रांतीं इजतखान वगैरे आहेत त्यांस ताकीद करून फौजसुद्धां मा॥र निल्लेकडे पाठवणें ह्मणजे फौजेच्या दबाबानें जें काम होणें तें होईल. मुल्कांत फितुर होणार नाहीं. यद्यपि दतीयेकर कऱ्हाऱ्हा धरून बसलेच तरी काय मुजाका आहे? फौज त्या प्रांतीं फिरूं लागलियावरि त्याचा आटा बंद करील ऐसा प्रकार आहे. तरि जें करणें तें विचारें यांची पैरवी करून सुरळीत होय तें करणें. रा॥ छ १७ सवाल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ९८ ] ॥ श्री ॥

अखंडित लक्षुमी अळंकृत राजमान्य राजश्री विसाजी कृष्ण व हरी गोपाळ गोसांवी यांसि:—

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सु॥ सितेन मया व अलफ. तुम्ही शिरहट्टी घेतली याचीं पत्रें पाठविलीं तीं पावोन संतोष जाहाला. उत्तरें आलाहिदा पुरवण्यांत लिहिलीं असत. त्याजवरून शिरहट्टीचा बंदोबस्त करून तुम्ही पुढें गेलांच असाल. कोठें गेलां काय वर्तमान तें आठा रोजाच्या अंतरानें लिहीत जाणें. वरकडही त्या प्रांतींचें वर्तमान लिहीत जाणें. जाणिजे. छ २६ रमजान. बहुत काय लिहिणें.

[ ९९ ] ॥ श्री ॥

राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री जयाजी शिंदे गोसांवी यांसि:—

अखंडित लक्ष्मी अळंकृत राजमान्य स्ने॥ बाळाजी बाजीराव प्रधान

---

८४. मवाशी=रानटी लुटारूंचें कर्म, धंदा.
८६. नतिजा=फळ, शिक्षा.
८७. हाल्खुद=जसें पाहिजे तसें, यथावश्य.
८८. ताबिजा=ताबियांतील ?
८९. मुजाका=किंमत, महत्व.

आशिर्वाद सु॥ सीत आर्बेन मया व अल्लफ. राजश्री अर्जुनसिंग राजे हे बंगाल्याचे खालीं हुजूर आले त्या तागायत हुजूरच आहेत. त्यास हे हुजूर आल्याअगोदर यांजकडे जागा होती ते जागा राजश्री सभासिंग याणीं हे हुजूर आले यास्तव झुंजून घेतली. यांचा कुंवर तेथें कामास आला. याप्रमाणें नाश जाहला. त्यास हे हुजूर आले होते कीं, पुढें कांहीं राज्य आपल्या जिमे करून घ्यावें, श्रम करावे, सहास करावें, कृपा संपादून घ्यावी. ऐसें असतां हे उमेद एकीकडेच राहोन यांची जागा होती ती जाऊन रहावयास स्थल नाहीं ऐसें जालें. आणि त्यांणीं तो एकनिष्टा धरून बसले आहेत. ऐशास आमच्या विचारें ऐसें आहे जे, यांणीं आपल्या बऱ्याकारणें कश्यप* धरला, चार वर्षें जाहालीं आणि यांची दाद न लागे. तेव्हां ही गोष्ट योग्य नाहीं. हें जाणून निकाल या प्रकारचा काढला आहे जे, हे हुजूर फिर्याद आले होते त्या अगोदर यांजकडे गांव गव्हा ज्याप्रमाणें चालत आले आहेत त्याप्रमाणें चालवावें. अधिकहीं कांहीं देऊं नये. त्यांत उणें करूं नये. ये विशीं यंदा सभासिंग याजकडील तह सरकारचा होणें तो जाहालियावरि सदर्हू प्रमाणें याची जागा यास द्यावयाचा करार करून याचे जिमे करावी. जाजती उपसर्ग लागों न द्यावा. याप्रमाणें खामखा[११] करावें. कदाचित बुंधेले ह्मणतील कीं, याची पुरातन जागा कांहीं नाहीं, ऐसे असतां काय म्हणून ते जागा द्यावी? तरि हे पुरातन आहेत म्हणोन द्यावी ऐसें नाहीं. हे सरकारांत आले त्या आगोदर याजकडे जागा होती त्यापासून याजकडे चालत नाहीं. कजिया करितात. यास्तव हुजूर फिर्याद आल्या अगोदर यांजकडे होती त्याजप्रमाणें यांजकडे चालों देत तें करणें. या उपरि यांचें काम लांबणीवर न घालणें. हे बहुत येथें हैराण जाहाले आहेत व यांची हैराण गत दूर होणें तें करणें. जाणिजे छ २९ रविलेवल बहुत काय लिहिणें[१२].

(लेखन सीमा)

[ १०० ] ॥ श्री ॥

राजश्री बाळाजी पंडित प्रधान दाजी गोसावी यांसि--

ॐ सकल गुणालंकरण अखंडित लक्षुमी अलंकृत राजमान्य स्ने॥ मानाजी आंगरे वजारत माब रामराम विनंती उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लेखन करीत असलें पाहिजे. विशेष--सांप्रत पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं

---

१०. नारो शंकर यांची.
११. खामखा=खचित, निश्चित.
१२. मागें पत्र (९५) व टीप ८० पहा.
* कश्यप=कांस, आश्रय.

अनुक्रमणिका

अभ **य** ऋषीतें प्रभु दे राक्षसहत विप्र बहुत पाहून ॥
जनकसुतेतें सांगे भूतांहित[51]हनन बहु तपाहून ॥ ८७ ॥
अव्या **जें**[52] दय प्रभु मग जेंवि चकोरासि चंद्रमा निववी ॥
तेंवि सुतीक्ष्ण[53]मुनीतें दर्शन याचें चि नित्य सस्यववी ॥ ८८ ॥
विस्म **य** पावे प्रभुवर ऐकुनियां वाद्यगीतनाद सरीं ॥
स्वर्गणिकां[54]हीं दिधला उग्रतपा मांडकर्णि सोहकरीं ॥ ८९ ॥
प्रख **रा** सिचापशरधर राम प्रभु दंडकाननीं हर्षे ॥
क्रमिता जाला तापसजनसत्कृतिकरुनियां दहा वर्षें ॥ ९० ॥
प्रथ **म** भ्रात्याते मग घटजातें[55] राम भेटला भावें ॥
त्या मुनि म्हणे तसें हें जेंवि समुद्रांत बेट लाभावें ॥ ९१ ॥
दे त्या **श्री** रामातें हरिदत्तें सर्व वैष्णवें शस्त्रें ॥
जैशीं दिधलीं पूर्वीं राक्षसविनयार्थ गाधिजें अस्त्रें ॥ ९२ ॥
मुनि **रा** जानुमतें तो प्रभु पंचवटीस जाय तो वाटे ॥
पितृसख[56] जटायु भेटे प्रिय साक्षाज्जनकसा चितो वाटे ॥ ९३ ॥
सप्रे **म** म्हणे त्यातें प्रभु हें स्वकुटुंब या जपा सून ॥
तुमची सीता ईतें पाळा गहनांत आजपासून ॥ ९४ ॥
अंड **ज** पतिस[57] पुसोनि प्रभु पंचवटींत राहिला उटजीं ॥
जैसा संतानींच्या[58] दिव्य मधुपराज पुष्पितीं कुटजीं[59] ॥ ९५ ॥
दुर्न **य** दशमुखभगिनी जी शूर्पणखा दुराशया दंडा ॥
जाली भाजन नासाकर्णयुगच्छेद या महा दंडा ॥ ९६ ॥
अंम[60] **रा** रि खर त्रिशिरा दूषण इत्यादि राक्षस क्रूर ॥
चवदा सहस्र वधिले रामें दुःसह हरीस[61] जे शूर ॥ ९७ ॥
हेम **म** य मृगामागें प्रभु दयिताप्रिय करावया लागे ॥
हा सीते हा लक्ष्मण ऐसें तो असुहरेषु[62]हत गांगे[63] ॥ ९८ ॥
सीता **ज** वळुनि दवडी सौमित्रिस तों चि दशमुखें हरिली ॥
ती क्षण सोडवुनि रणीं सत्कीर्ति सुगति जटायुनें वरिली ॥ ९९ ॥
निर्द **य** निस्त्रप[64] रावण नेउनि ठेवी तिला अशोकवनीं ॥

---

५१. भूताहितहनन=सर्व भूतमात्र शत्रूचें हनन. ५२ अव्याजदय=निष्कपट आहे दया ज्याची. ५३ सुतीक्ष्ण=मुनिविशेष. ५४ स्वर्गणिका=अप्सरा. ५५ घटज=अगस्त्य ऋषि. ५६ पितृसख=बापाचा मित्र. ५७ अंडजपति=जटायु. ५८ संतान=कल्पवृक्ष. ५९. कुटज=कुडयाचें झाड. ६० अमरारि=राक्षस. ६१ हरि=इंद्र. ६२ असुहरेषुहत=प्राणहारक बाणानें विद्ध. ६३ गागे=ओरडे. ६४ निस्त्रप=निर्लज्ज.

ती त्यासि म्हणे यावें सुकवीच्या सुयश रे पशो कवनीं ॥१००॥
स्फोट ज शून्य विलोकुनि हाय म्हणे प्रभु फिरे सशोक वनीं ॥
जो दुःखभर सविस्तर आला वाल्मीकिच्या च तो कवनीं ॥ १०१ ॥
अन य त्नें दशवदनें साती इतकें वदोनि जो मेला ॥
प्रभु त्या तातसख्या[६५] जल देउनि हुडकित पुन्हा वनीं गेला ॥ १०२ ॥
प्रभु रा नांत भ्रमतां धरि योजनभुज निशाचर कबंध ॥
त्याचे बाहू छेदुनि करुणार्णव चुकविती नरकबंध ॥ १०३ ॥
तो सु म ति होय राक्षस कोण तुम्ही काय या वनीं कार्य ॥
ऐसें पुसे तयातें सांगे सौमित्रि ऋजुमना[६६] आर्य ॥ १०४ ॥
सांगे श्री मंतातें पुशिलें निजवृत्त तो हि शापाच्या ॥
अंतातें जाणुनि दनुदानव नाशार्थ शेषपापाच्या ॥ १०५ ॥
रुचि रा कृति मी होतों उग्राकारें मुनीस भय भारी ॥
देतां जालों शापी स्थूळशिरा मुनि न रूप मज तारी ॥ १०६ ॥
हें म म वृत्त असा मी झालों शक्राशनिप्रहारानें[६७] ॥
दाहोत्तरकार्य करिन शोधाल म्हणत पुन्हा न हा रानें ॥१०७॥
त्याचा ज गदीश करिति दाह वनीं तो चि दिव्य रूप धरी ॥
बसुनि विमानीं प्रभुला सांगे इष्टाप्तिहेतु युक्ति बरी ॥ १०८ ॥
रामा य मनियमवती सुमति मतंगाश्रमीं असे शबरी ॥
दे दर्शन तीस जिला भेटि तुझी गति तशी गमे न बरी ॥ १०९ ॥
प्रव रा सरसी पंपा संपावा ताप मग पहा धीरा ॥
नग[६८] ऋष्यमूकनामा जवळ चि आहे रघूत्तमा वीरा ॥ ११० ॥
तेथें म नुजश्रेष्ठा वानर आहेत पांच रवितनय ॥
सुग्रीव तयांत वसे तो रामा योग्य तुज सखा सनय ॥ १११ ॥
ऐसें ज लदश्यामें रामें ऐकोनि तो दनु[६९] स्वर्गा ॥
पाठविला हें प्रभुचें निरुपम कारुण्य आवडे भर्गा[७०] ॥ ११२ ॥
हृद य द्रवेल गाइल साधुसभा आत्मपद यश बरी तें ॥
चरित कराया भेटे होउनि अत्यंत सदय शबरीतें ॥ ११३ ॥
ती पू ज न करुनि म्हणे रामा मद्गुरु मतंग मुनि गेला ॥
सत्यपदा प्रति जेव्हां धन्य तुवां चित्रकूट नग केला ॥ ११४ ॥
सुश्रे य मला गुरुनें कथिलें तें सिद्ध जाहलें आजी ॥

---

६५ तातसखा=जटायु. ६६ ऋजु=उजु, सरळ. ६७ अशनि=वज्र. ६८ नग=पर्वत ६९ दनु=राक्षस. ७०. भर्ग=शिव.

अनुक्रमणिका

तृप्ता केली होती करुनि जसी चातकी तशी आ जी ॥ ११५॥
सद रा तिन्ना प्रभुला पंपापथ कथुनि गुरुकडे जाया ॥
राया नमुनि रघूच्या होमी ज्वलदग्नि मानि ती काया ॥ ११६ ॥
होय म हित रूप तिला प्राप्त वर विमान सत्य लोक मग ॥
सानुज पंपा पावे तो श्रीराम स्वभक्तकल्पनग* ॥ ११७ ॥

## ॥ अथ किष्किंधाकाण्डं ॥

सुखदा श्री[७१] पंपेची परि झाली प्रभुमनीं असुख रचिती ॥
इतरांचे तों तैशा विरहीं तत्काळ ती असु खरचिती ॥ ११८ ॥
हा सीते रा[७२]कापतिमुखि सुख मज तव समागमें होतें ॥
कोणी न म्हणे म्हणतो पुनरपि कर नवस माग मी हो तें ॥
बहु स म जावी लक्ष्मण मग तेथुनि ऋष्यमूकगोत्रा[७३]स ॥
जाती त्यांतें पाहुनि पावे सुग्रीवकीशीं[७४] तो त्रास ॥ १२० ॥
वातात्म ज पाठविला सुग्रीवें विप्रवेष तो यातें ॥
भेटे पावोनि निवे पांथ बहु तृषार्त जेंवि तोयातें ॥ १२१ ॥
तो आश य वृत्त पुसे लक्ष्मण सांगे तयासि तो बाहे ॥
स्कंधीं करि सुगळाशीं भेटि कपिप्रभु हि बहु सुखा लाहे ॥
त्या भास्क रा[७५]त्मजाशीं प्रभुशीं शास्त्रोक्त सख्य तें झालें ॥
आलें मनास रविच्या शक्राचें चित्त हर्षलें भ्यालें ॥ १२३ ॥
दोघे स म सुखदुःख प्रिय कार्य करावया प्रतिज्ञा ते ॥
करितेजाले स्वयशें सुखवाया सज्जनांप्रति ज्ञाते ॥ १२४ ॥
नेली र ज निचरें स्त्री अनुमानें जानकी असें जाणे ॥
अस्मच्छ्रुतीस वाढित गेली ती रामनाम हीं वाणें[७६] ॥ १२५ ॥
[७७]रुचिच य मणिकांचनमय दिव्य अलंकार उत्तरीयपटीं ॥
बांधुनि सोडुनि गेली आम्हा कीशांत याचि अद्रितटीं॥ १२६॥
रामा या ज गतीधर[७८]कुहरीं ते नगें[७९] तसे चि आहेत ॥
प्रभु त्यासि म्हणे दाखिव आण अलंकार पुरविं हा हेत॥१२७॥
सीता प्रि य नगें[७९] पाहे राम म्हणे लक्ष्मणा पहा बा हे ॥
तो नेणे इतर म्हणे जाणें नूपुर चि यांत हें आहे ॥ १२८ ॥

* कल्पतरु. ७१ श्री=शोभा. ७२ राका=पूर्णिमा. ७३ गोत्र=पर्वत. ७४ कीश=वानर. ७५ भास्करात्मज=सुग्रीव. ७६ वाणें=वायनें. ७७ रुचि=शोभा. ७८ जगतीधरकुहर=पर्वत गुहा. ७९. नग=दागिने.

साश्रु उ **रा** शीं प्रभु धरि भिजवी शोकोदकें समस्त नग ॥
हारासि म्हणे हा तूं भाग्यें होतासि मजसम [८०]स्तनग ॥ १२९ ॥
बा सांगें **म** ज नेली कोणिकडे राक्षसी प्रिया माजी ॥
त्या वधिन सपरिवारा मज युग जी येतसे [८१]त्रियामा जी ॥१३०॥
सुगळ **श्री** रामातें अश्रु पुसुनियां म्हणे तया अरितें ॥
नेणें भेटविन तुज स्त्रीरत्न करुनि यत्न मी परि तें ॥ १३१ ॥
माजी ही **रा** जसुता स्त्री हरिली वाळिनें तदापि धिरा ॥
मी कपि हि त्यजित नसें तूं कां त्यजितोसि पंडिता वीरा॥१३२॥
त्याप्रति **म** नुजवर म्हणे करितों बा प्रथम मी तुझ्या कार्या ॥
शोधाया मद्दयिता मग करशील प्रयत्न तूं आर्या ॥ १३३ ॥
प्रभु बी **ज** पुसे तैशा वैराचें सुगळ तो असें कळवी ॥
मायावी असुर तया वाळी भंगूनि संगरीं पळवी ॥ १३४ ॥
तो सभ **य** शिरे विवरीं द्वारीं ठेवूनि मज तयामागे ॥
शिरला वाळी हि जसा व्याघ्र चि व्याघ्राचिया वधा रागें॥१३५॥
संवत्स **रा** उपरि ये रक्ताचा विवरभरि महापूर ॥
शब्द न पडतां कानीं गमलें वधिला चि शत्रुनीं शूर ॥१३६॥
शोकें भ्र **म** लों विवरद्वारीं ठेवूनि गिरिधरा आलों ॥
रडलों अभिषेकीं मी वश सचिवाच्या दुराग्रहें जालों ॥ १३७॥
तो वाळी **ज** यशाली ये मज पाहुनि पदीं भरे रागें ॥
अंगें मारीन ह्मणे भ्रमलों सर्वत्र लागला मागें ॥ १३८ ॥
हा आश्र **य** निर्भय नग मज कारण सांगतों तुला याचे ॥
वाळी बळजल[८२]धिमथन करि दुंदुभिनामका [८३]लुलायाचें ॥ १३९॥
त्यातें यो **ज** न उडवी तत्बळदर्पासि निंदुनि करानें ॥
आश्रम मतंगमुनिचा भरला तद्रक्तबिंदुनि[८४]करानें ॥ १४० ॥
क्षुब्धाश **य** मुनि शापी तो वाळी मूढ ऋष्यमूकनगीं ॥
[८५]व्यसु हो प्रवेशतां ची क्षम कोण मदुक्तलंघनास जगीं ॥१४१॥
वाळिप **रा** क्रम परिसुनि पादांगुष्ठें शरीर दश गांवें[८६] ॥
प्रभु दुंदुभिचें उडवी ज्याचें शेषें असीम यश गावें ॥ १४२॥
एके चि **म** हाबाणें प्रभु भेदी सप्तशालभूमितळ ॥
वाळिवधीं संप्रत्यय होउनि वर्णी [८७]सुकंठ रामबळ ॥ १४३ ॥

---

८० स्तनग=स्तनावर लोळणारा. ८१. त्रियामा=रात्र. ८२ जलधि=समुद्र. ८३ लुलाय=रेडा. ८४ निकर=समूह. ८५ व्यसु=मृत. ८६ गांवें=योजनें. ८७ सुकंठ=सुग्रीव.

वाळीतें **श्री** रामप्रभु मारायासि सिद्ध होय मग ॥
सुगळासि म्हणे हटिक[88]त्वदहित मब्दाणविद्ध हो[89]यमग ॥ १४४ ॥

तो सम **रा** येतां प्रभु एकेचि शरें तयां उरीं ताडी ॥
पाडी तद्राज्यश्रीस्त्री भोगायासि तदनुजा धाडी ॥ १४५ ॥

वानर **म** हाबळ अमित सुग्रीवें आणवूनि भेटविले ॥
त्यांचे प्रतापदहन प्रभुपवमानें पळांत पेटविले ॥ १४६ ॥

सुर[90]रां **ज** दिशेसि विनत वरुणदिशेतें सुषेण पाठविला ॥
[91]धनददिशेतें शतबळ सुग्रीवें पण मनांत आठविला ॥ १४७ ॥

तैसेचि **य** मदिशेतें जांबवदंगदमरुत्सुतादि कपी ॥
धाडी मास अवधि करि कीं प्रभु विरहार्त जळ हि नीट न पी॥

शोधुनि **रा** जसुतेतें विनतादिक परतले श्रमुनि आले ॥
वाळिसुतादि अवधितें लंघुनि चिंतार्थ शासना भ्याले ॥ १४९ ॥

म्हणति **म** रावें दुस्तर सागर पाहोनि बोलिले हाय ॥
धन्य जटायु प्रभुच्या जेणें कार्यार्थ वेंचिला काय ॥ १५० ॥

त्या अनु **ज** मरणपरिसुनि कीशांसि पुसे जटायुचा भ्राता ॥
संपातिनामका त्या अंगद कथि वृत्त सुत जसा ताता ॥ १५१ ॥

अर्पीन तो **य** भ्रात्या सांगे निजवृत्त जानकी शोध ॥
तो धर्मज्ञ म्हणे मज साधुनिशाकरमुनींद्र करि बोध ॥ १५२ ॥

कथितां **ज** नकसुतेची वार्ता तच्छोधकासि तुज लक्ष ॥
दक्ष स्तवितिल रवितेजें दग्ध भव्य नव पक्ष ॥ १५३ ॥

सीता प्र **य** ता दिसती तिजला लंकापुरीं अशोकवनीं ॥
शत योजन पाहतसे गृध्र करा यत्न जा तिच्या अवनीं ॥ १५४ ॥

गृध्रव **रा** नें ऐसें सांगुनि होउनि सपक्ष हर्षानें ॥
केलें गमन निववले कपि सर्व जसे मयूर वर्षानें[92] ॥ १५५ ॥

मारुति **म** हेंद्रशिखरीं चढला ऋक्षपकतस्तवें फुगला ॥
निजबळ कळतां सद्यश मिळतां राहेल कवि कसा उगला ॥ १५६ ॥

---

## ॥ अथ सुंदरकांड ॥

बळसिंधु **श्री** मारुति लंघुनि शतयोजनाब्धि तो पारा[93] ॥
पावे प्रभुवरशरसा ज्या अतिदुस्तर हि मार्ग सोपारा ॥ १५७ ॥

---

८८ अहित=शत्रु. ८९ यमग=मृत. ९० सुरराजदिशा=पूर्व. ९१ धनददिशा=उत्तर. ९२ वर्ष=वृष्टि. ९३. पार=पलीकडील बाजू.

हरुनि प **रा** क्रमलेशें मारुति लंकाधिदेवतातेजा ॥
शिरला पुरींत तृणसे राक्षस देवा द्विजाग्नि खाते ज्या ॥ १५८ ॥

रावणधा[९४] **म** विलोकुनि पाहे रामप्रिया अशोकवनीं ॥
तों तेथें तो खळ ये तीतें प्रार्थूनि न्यावया भवनीं ॥ १५९ ॥

धिःकारी र **ज** निचरा तें बैसुनि शिशु[९५]पोनगीं पाहे ॥
मारुति मनीं म्हणे हे प्रभुला योग्या महासती आहे ॥ १६० ॥

विफळप **य** त्न होउनि दशमुख जोडुनि म[९६]हाघरा गेला ॥
नव्हतां वश गिळिन असें वदुनि न पावुनि म[९७]हाघ रागेला ॥१६१॥

विश्वास पु **रा** या तो प्रभुगुण गाऊनि दे तिला मु[९८]द्रा ॥
चूडा[९९]मणिसह देवी प्रभु आणाया निरोप दे रु[१००]द्रा ॥ १६२ ॥

मथुनि प्र **म** दवन वधुनि बळ [१]अक्ष म्हणे मनांत कां पडला ॥
दृष्टिस न दशमुख रणीं दाटुनि कपिघनरवासि सांपडला ॥१६३॥

नेला प्रभं **ज** [२]नैतनय बांधुनि राक्षससभेसि बोलविला ॥
बोलुनि सरमुनिमस्तक शतवार सकंपसा चि डोलविला ॥ १६४ ॥

श्रीरामप्रि **य** सख हो देतो जे दास देव देवदया ॥
शरणागता मज अभयदाता तूं करिल देवदेव दया ॥ १६५ ॥

प्रबळ स्त्री **ज** नकसुता न शिवावें तापल्या पहारेंतें ॥
अतिहित या ही त्या ही*लोका आपल्या पहा रेतें ॥ १६६ ॥

प्रभु[३]चें प्रि **य** वस्तु कधीं न जिरे साजे चि ना पदक चोरा ॥
अनुभविल केशराचें कैसें रे राक्षसा प[४]द क[५]चोरा ॥ १६७ ॥

इत्यादि ब **रा** रागें भरुनि वदे तें न त्या खळा साहे ॥
पाहे असिस म्हणे तों त्या त[६]दनुज साधु दूत हा आहे ॥ १६८ ॥

तैलार्द्रें अ **म** †राहितवस्त्रशतें वेष्टवूनि पुच्छातें ॥
पेटवुनि म्हणे फिरवा लंकेंत करूनि घोष तुच्छातें ॥ १६९ ॥

वातसुत **श्री** रामो जयति असें म्हणुनि तो उडे सहसा ॥
जाळी लंकेसि म्हणे रे राक्षस हो रडा मला न हसा ॥ १७० ॥

---

९४ धाम=घर. ९५ नग=झाड. ९६ महाघ=मोठें पाप. ९७ मह=आनंद. ९८ मुद्रा=अंगठी. ९९ चूडामणि=मुद. १०० रुद्र=मारुति. १ अक्ष=रावणाचा पुत्र. २ प्रभंजनतनय=मारुति. * येथें अक्षरें कमी आहेत. ३ प्रभुचें वस्तु=' वस्तु ' शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे. ४ पद=स्थान, पदवी. ५ कचोरा=एक प्रकारची वनस्पति-हिचे अंगीं सुवास असल्यामुळें ही केशांना लावीत असतात. ६ तदनुज=बिभीषण. † अमराहित=राक्षस.

होय समी **रा** त्मज[७] तो दीन श्रीरामदार[८]दाहभयें ॥
विझवुनि पुच्छ समुद्रीं श्रीतें पाहुनि निवे बहु स्वजयें ॥ १७१ ॥

पुनरपि **म** हितनयेतें नमुनि तदाज्ञा खळांसि निंदुनि घे ॥
तेयुनि कीशचकोरां निववाया तो कपींद्रइंदु निघे ॥ १७२ ॥

त्या लंघुनि **ज** लधीतें गर्जोनि महेंद्रपर्वतीं उतरे ॥
जाले जयापुढें ते राक्षस सिंहापुढे जसे कुतरे ॥ १७३ ॥

तो परम **य** शस्वी त्या वृद्धा भेटे नमूनि आनंदी ॥
कपि आलिंगुनि म्हणती श्रीरामनिदेश[९]शंभु हा नंदी ॥ १७४ ॥

ज्यां शुद्धाचा **रा** ती प्रभुदयिता देखिली सती सीता ॥
गीता मुमुक्षुनें तशि जाली मद्दृष्टिदर्शनें सीता ॥ १७५ ॥

केलें सद्गु **म** भग्न क्षणदाचर[१०] ही त्यजूनियां शंका ॥
डंका श्रीरामाचा गाजविला ती हि जाळिली लंका ॥ १७६ ॥

हें वृत्त आं **जं**[११] नेयें कथितां परमोत्सवें वनीं चेष्टा ॥
बहु करिति उडति नाचति भक्तजनेष्टा चि त्या न नीचेष्टा॥१७७॥

प्रभुतें प्रि **य** कळवाया ते जांबवदादि उसळले खांतें[१२] ॥
यश अमृतवर्ष कपिबळ अंकुरलें शुष्क मुसकलें[१३] खांतें[१४] ॥ १७८ ॥

वानररा **ज** मन:प्रियमधुवन अत्यंत रम्य पाहून ॥
शिरले युवराजाच्या आज्ञेतें मागतां च लाहून ॥ १७९ ॥

राजांचें भ **य** धरुनी वनपाळा दधिमुखासि ताडून ॥
पाहूनि फळें भक्षुनि मधु[१५] प्याले मधुवनांत झोडून[१६] ॥ १८० ॥

तो वानर **रा** जातें सांगे दधिमुख रडोनि बोभाट ॥
त्या कार्यसिद्धि समजे वाटे सद्गुण चि वर्णितो भाट[१७] ॥ १८१ ॥

लक्ष्मण स **म** जे समजे राम हि निजकार्यसिद्धि कीं भृत्य[१८] ॥
करितात अतिक्रम[१९] ते करिती स्वाम्युक्तसिद्धि जें कृत्य ॥ १८२ ॥

ते विजय **श्री** मंडित पवनसुतप्रमुख सर्व जे आले ॥
श्रीरामलक्ष्मणसुगळ यांतें साष्टांग वंदिते जाले ॥ १८३ ॥

विरहाधी **रा** त्मा प्रभु त्यांसि पुसे लागली कशी शुद्धी[२०] ॥
सीता कोठें आहे माझ्या ठायीं कशी तिची बुद्धी ॥ १८४ ॥

---

७ समीरात्मज=मारुति. ८ रामदार=सीता. ९ निदेश=आज्ञा. १० क्षणदाचर=राक्षस. ११ आंजनेय=मारुति. १२ ख=आकाश. १३ मुसकलें=मासलें, कुजलें. १४ खात=खत (शेत, झाडें इत्यादिकांचे पोषणार्थ घालतात तें). १५ मधु=मद्य. १६ झाडून=सर्व. १७ भाट=स्तुतिपाठक. १८ भृत्य=चाकर. १९ अतिक्रम=मर्यादा उल्लंघन. २० शुद्धि=शोध.

अनुक्रमणिका

